राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मूलभूत / पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अनुदान वितरित करण्यास मंजूरी देण्याबाबत सन २०१५-१६.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक: ग्राक्षेवि-२०१६/प्र.क्र.४४-भाग -१/का.९**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २३ जानेवारी, २०१७.

वाचा :- १) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्रं. अविवि २०१५/प्र.क्र.७७/१५/ का-९ दि.२२/०९/२०१५.
२) शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, ग्राक्षेवि- २०१६/प्र.क्र.४४/का.९, दि. ३१ मार्च, २०१६.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी जि.प. गोंदिया यांचे पत्र क्र. जिपगों /पंचा/अल्प/ डे-२४/कावि-१७५५/२०१६/दि.१७/०९/२०१६

**शासन आदेश :-**

शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, ग्राक्षेवि- २०१६/प्र.क्र.४४/का.९, दि. ३१ मार्च, २०१६ मधील परिशिष्ट “अ” मधील अ. क्र.१३४ मध्ये मौजे सालेकसा, जिल्हा गोंदिया या गावातील कब्रस्तान वॉलकंपाऊंड करिता रु.१० लाख (रुपये दहा लाख फक्त) इतके अनुदान मंजूर करण्यात आले होते. परंतु मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया यांच्या उपरोक्त संदर्भ क्र. ३ च्या पत्रात नमूद केल्यानुसार दि.१२फेब्रुवारी, २०१५च्या शासन परिपत्रकान्वये सालेकसा ग्रा.प्र.चे नगरपंचायत मध्ये रुपांतर झालेले आहे.

२. सदर शासन निर्णयातील परिशिष्ट “अ” येथील गोंदिया जिल्ह्यातील अ.क्र.१३४ ग्रामपंचायतींमधील कामांना मान्यता देण्यात आली होती.

| अ.क्र | जिल्हा | तालुका | ग्रामपंचायती चे नाव | कामाचे नांव | मंजूर निधी (रू. लाख) |
|---|---|---|---|---|---|
| १३२ | गोंदिया | सालेकसा | आमगांव खुर्द | जुमनशाह ते खोटोलाशाहच्या घरापर्यंत सिमेंट रोड. | २.९९ |
| १३४ | | | सालेकसा | कब्रस्थानला वॉल कंपाऊंड. | १०.०० |

३. गोंदिया जिल्ह्यातील सालेकसा या ग्रामपंचायतीचे नगर पंचायत मध्ये रुपांतर झालेले आहे. त्यामुळे उपरोक्त अ.क्र. १३४ मधील ग्रां.प. सालेकसा ऐवजी ग्रा.पं. आमगाव (खु.), जिल्हा गोंदिया यांना खालील कामाकरिता सन २०१५-१६ मधील निधी वळविण्यास परवानगी देण्यात येत आहे.

त्यानुसार सदर काम पुढीलप्रमाणे असेल.

| अ.क्र | जिल्हा | तालुका | ग्रामपंचायती चे नाव | कामाचे नांव | मंजूर निधी (रू. लाख) |
|---|---|---|---|---|---|
| १३२ | गोंदिया | सालेकसा | आमगांव खुर्द | आमगांव (खु) येथील कब्रस्थान आवारभिंत बांधकाम. | ७.०० |

४. उपरोक्त संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयामधील तरतूद व अटीनुसार प्रत्येक ग्राम पंचायतीला फक्त एकदाच रु.१० लाखाच्या मर्यादेत अनुदान दयावयाचे आहे. ग्रामपंचायत (आता नगर पंचायत) सालेकसाकरिता दिलेला रु.१०.००लाख इतका निधी मौजे आमगाव (खु.) करिता रु.७.००लाख वळविल्यास रु.३.००लाख इतकी रक्कम जिल्हाधिकारी, गोंदिया या कार्यालयाकडे शिल्लक राहणार . त्यामुळे जिल्हाधिकारी, गोंदिया या कार्यालयाने उर्वरित रु.३,००,०००/-(रुपये तीन लाख फक्त) इतके अनुदान तात्काळ शासनाच्या कोषागारात जमा करावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०१२४१२०९४८०३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shashikant R Salunkhe

Digitally signed by Shashikant R Salunkhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3f496781d7330d61b41c4ca6211158b72d2ab6bf15878cd9312f9d41519ea160, cn=Shashikant R Salunkhe
Date: 2017.01.24 12:11:34 +05'30'

(श. र.साळुंखे)
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. संबंधित जिल्हाधिकारी/ मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद
१०. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद
११. मा.मंत्री/ राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
१२. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
१३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
१४. निवडनस्ती.